**राज्यातील शासकीय गोदामातील अन्नधान्याची पोती सुतळीने शिवण्याची प्रचलित कार्यपध्दती बंद करुन त्या ऐवजी रंगीत चिन्हांकित दोरा वापरुन पोती सिलबंद करण्यासाठी शिलाई यंत्र व दोरा खरेदीसाठी विभागीय भांडार खरेदी समिती स्थापन करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३११६/प्र.क्र.१७१/ना.पु.१६-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १७ एप्रिल, २०१७.

**वाचा :** शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III/ उद्योग-४, दि. १ डिसेंबर, २०१६.

**प्रस्तावना :**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्याय संदभार्धिन दि. १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २.९.२ नुसार प्रत्येक प्रशासकीय विभागाने विभागांतर्गत वस्तु खरेदीसाठी विभागीय भांडार खरेदी समिती स्थापन करावी अशा सुचना दिलेल्या आहेत.

राज्यातील शासकीय गोदामातील अन्नधान्याची पोती प्रमाणित करुन सुतळीने शिवण्याची प्रचलित कार्यपध्दती बंद करुन त्या ऐवजी दोरा वापरुन पोती शिलाई यंत्राद्वारे सिलबंद करण्याची कार्यपध्दती स्विकारण्याच्या अनुषंगाने उप सचिवांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. उपरोक्त समितीने अन्नधान्याची पोती प्रमाणित करुन सुतळीने शिवण्याची प्रचलित कार्यपध्दती बंद करुन त्या ऐवजी रंगीत चिन्हांकित दोरा वापरुन पोती शिलाई यंत्राद्वारे सिलबंद करण्याची कार्यपध्दती स्विकारण्याची शिफारस केली आहे. त्याअनुषंगाने शिलाई यंत्र व दोरा खरेदी प्रक्रिया पारपाडण्यासाठी विभागीय भांडार खरेदी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय :**

राज्यातील शासकीय गोदामातील अन्नधान्याची पोती प्रमाणित करुन सुतळीने शिवण्याची प्रचलित कार्यपध्दती बंद करुन त्या ऐवजी रंगीत चिन्हांकित दोरा वापरुन पोती शिलाई यंत्राद्वारे सिलबंद करण्याच्या अनुषंगाने विभागीय भांडार खरेदी समिती स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार खरेदी समितीची खालील प्रमाणे स्थापना करण्यात येत आहे :

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव, अनापुवग्रासंवि | अध्यक्ष |
| २. | नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा मुंबई | सदस्य |
| ३. | संचालक, नागरी पुरवठा व सह सचिव, अनापुवग्रासंवि | सदस्य |
| ४. | उप सचिव (१६ अ), अनापुवग्रासंवि | सदस्य |
| ५. | वित्तीय सल्लागार व उप सचिव, अनापुवग्रासंवि | सदस्य |
| ६. | उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७. | भांडार खरेदी समितीचे प्रतिनिधी (उद्योग संचालनालय, मुंबई) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ८. | प्रा. डॉ. नितीन गुल्हाने, हेड, मॅकॅनिकल इंजिनिअर डिपार्टमेंट व प्रा .डॉ .सचिन मस्तुद, एसोसिएट प्रोफेसर, मॅकॅनिकल डिपार्टमेंट, वीर जीजामाता टेक्नीकल इंन्स्टिट्यूट (VJTI), माटुंगा ,मुंबई | निमंत्रीत सदस्य |
| ९. | उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. उपरोक्त समितीतील अ.क्र. ८ येथील निमंत्रीत सदस्यांना शासनाच्या प्रचलित नियमानुसार अनुज्ञेय असलेले भत्ते देय राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१७१२५५०२५१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2017.04.17 12:57:27 +05'30'

**(सतिश श्रीधर सुपे)**
उप सचिव

**प्रति,**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्य मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
५) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई सर्व उपायुक्त (पुरवठा),
६) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
७) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त, कार्यालय
८) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
९) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१०) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
११) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१२) वित्त विभाग ( व्यय ४), मंत्रालय, मुंबई.
१३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
१४) विकास आयुक्त (उद्योग) व मध्यवर्ती भांडार खरेदी संघटना, नवी प्रशासकीय भवन, मुंबई
१५) खरेदी समितीचे सर्व पदाधिकारी
१६) निवड नस्ती/नापु-१६अ.